नवीन व्यावसायिक महाविद्यालयांना
मंजूरी (दूसरी यादी)

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
आदेश क्रमांक: एनजीसी २०१०/ (२४७/१०)/ मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ जुलै, २०१०

**पहावे :** १) शासन निर्णय क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.१.२०१०, व दि. ३.४.२०१० (Task Force)
२) शासन पत्र क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.३.२०१०, (Task Force)
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव
क्र.अमवि २०१०/कोवि/प्रस्ताव २०१०-११/मवि-२-३/१३१०, दि.३१.०५..२०१०

**आदेश**

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२ (४) नुसार राज्यातील विद्यापीठांकडून नवीन (पारंपारिक/व्यावसायिक) महाविद्यालयांचे प्रस्ताव शासनाकडे परवानगीसाठी प्राप्त झाले आहेत. विद्यापीठांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची शासन निर्णय क्र. एनजीसी २०१०/ (७/१०)/ मशि ४, दिनांक १५.१.२०१०,३.४.२०१०. व अन्वये नियुक्त केलेल्या कार्यबलगटाद्वारे तपासणी करुन घेतली आहे. विद्यापीठाच्या व कार्यबलगटाच्या शिफारशी विचारात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२ (५) अन्वये प्राप्त अधिकारानुसार खालील नवीन व्यावसायिक महाविद्यालयांना सन २०१० या शैक्षणिक वर्षापासून परिच्छेद २ व ३ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन **कायम विना अनुदान तत्वावर** शासनाची परवानगी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | संस्थेचे नांव व पत्ता | प्रस्तावित व्यावसायिक महाविद्यालयाचे नांव व ठिकाण | विद्याशाखेचे महाविद्यालय |
|---|---|---|---|
| **स्वामी रामानंदतीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड** | | | |
| १. | स्वास्थ्यपूर्ती वैद्यकीय प्रतिष्ठान सिडको नवीन नांदेड, ता.जि.नांदेड | ग्लोबल इन्स्टिटयूट ऑफ हॉस्पीटल मॅनेजमेंट, कॉलेज मित्र नगर, हिंगोली रोड, ता.जि.नांदेड | हॉस्पीटल मॅनेजमेंट डिप्लोमा कोर्स |
| २. | मॉरल मल्टिपर्पज एज्युकेशन सोसायटी, लातूर | महाराष्ट्र ललित कला महाविद्यालय, अंबेजोगाई रोड, लातूर | बी.ए. (ललीत कला) |
| ३. | श्यामसुंदर मुंढे प्रतिष्ठान, खादगांव,गंगाखेड, जि. परभणी | संत भगवानबाबा विधी महाविद्यालय, गंगाखेड, जि. परभणी | विधी |
| ४. | गैबी नागेंद्र महाराज शिक्षण संस्था, पानभोसी, ता.कंधार, जि.नांदेड | महात्मा गांधी कॉलेज ऑफ बी.एस्सी. फूड टेक्नॉलॉजी | बीएस्सी (फूड टेक्नॉलॉजी) |
| **उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव** | | | |
| ५. | खान्देश कॉलेज एज्युकेशन सोसायटी, मु.जे महाविद्यालय परिसर, जळगांव ४२५ ००२ | पदव्युत्तर विज्ञान महाविद्यालय मू.जे. महाविद्यालय, परिसर, जळगाव | एम.एस्सी (रूरल डेव्हलपमेंट, केमेस्ट्री, मायक्रोबायलॉजी, जिओ-इन्फॉरमॅटीक्स, बायोटेक्नॉलॉजी), |

| | | | |
|---|---|---|---|
| ६. | श्री.जी.बहुउद्देशिय मंडळ, भुसावळ | भुसावळ | एम.बी.एम (एम.सी.एम) |
| | **एस.एन.डी.टी. विद्यापीठ, मुंबई** | | |
| ७. | ज्ञानकुंज शिक्षण सेवाभावी संस्था, मु. पो. मानसपूरी, ता. कंधार जि. नांदेड | बी.सी.ए. महाविद्यालय, मु.पो. ओरोस, ता. कुडाळ, जि. सिंधुदूर्ग | बी.सी.ए |

**३. अटी व शर्ती :**

I. ज्या संस्थांना नवीन व्यावसायिक महाविद्यालय मंजूर करण्यात आले आहे, त्या संस्थांनी ते भविष्यात कोणत्याही अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र सहसंचालक, उच्च शिक्षण, यांचेकडे सादर करावे,

II. संबंधित विभागीय सहसंचालकांचे वरील अ.क्र. १ मध्ये नमूद केलेले हमीपत्र सादर केल्याविषयीचे पत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठांनी संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये,

III. नवीन व्यावसायिक महाविद्यालयांनी कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत,

IV. विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग महाविद्यालयाने नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात,

V. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या युजीसी ( ॲफिलिएशन ऑफ कॉलेजेस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन, २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहीत केलेल्या निकषांची पुर्तता केल्याशिवाय संबंधित व्यावसायिक महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

VI. ही मान्यता, फक्त शैक्षणिक वर्ष २०१०-११ पूरती मर्यादित आहे. यावर्षी नवीन व्यावसायिक महाविद्यालय सुरु न करणा-या महाविद्यालयांची ही मान्यता आपोआप रद्द झाली असे समजण्यात येईल.

VII. अ.क्र. ४ मधील संस्थेच्या महाविद्यालयास दिलेली मान्यता सदर संस्थेच्या मु.जे महाविद्यालय परिसर, जळगांव येथील नवीन एम.एस्सी. बायोटेक्नॉलॉजी महाविद्यालयास समदिनांकाच्या समांतर निर्गमित शासन आदेशान्वये दिलेली मान्यता रद्द करुन देण्यात येत आहे.

**३.** विद्यापीठाचे संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी विद्यापीठांनी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन करुन परवानगी बाबत खात्री करुन घ्यावी. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

४. हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००८०७१८३२५९००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि.गो. चांदेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

(१) सर्व कुलसचिव, अकृषी विद्यापीठे
(२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
(३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
(४) सर्व संबंधित संस्था